**प्रथम वर्ष एम. बी. बी.एस. अभ्यासक्रम महाविद्यालयाला मान्यता देण्याबाबत.**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर वैद्यकीय प्रतिष्ठान, डॉ. हेडगेवार हॉस्पिटल, छत्रपती संभाजीनगर संचलित श्री रामचंद्र इन्स्टिट्युट ऑफ मेडिकल सायन्सेस (एसआरआयएमएस), छत्रपती संभाजीनगर या वैद्यकीय महाविद्यालयाला सन २०२४-२५ करिता प्रथम बॅच सुरु करण्यास परवानगी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

शासन निर्णय क्रमांक एमईडी-२०१८/प्र.क्र.१७/१८/शिक्षण-१,

९वा मजला, गो.ते. रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१.

दिनांक :- २३.०८.२०२४

**वाचा** :- १) शासनाचे समक्रमांकाचे आवश्यकता प्रमाणपत्र क्र.एमईडी-२०१८/प्र.क्र.१७/१८/शिक्षण-१, दि.१३.१०.२०२३

२) राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. N-२२०११/१२७/२०२४-Assessment Cell/MARB (८२८०१५०), दि. १०.०८.२०२४.

**प्रस्तावना:-**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर वैद्यकीय प्रतिष्ठान, डॉ. हेडगेवार हॉस्पिटल, छत्रपती संभाजीनगर संचलित श्री रामचंद्र इन्स्टिट्युट ऑफ मेडिकल सायन्सेस (एसआरआयएमएस), गट क्र. २२/२४, मुर्तूजापूर, बीड बायपास रोड, छत्रपती संभाजीनगर या वैद्यकीय महाविद्यालयास संदर्भ क्रमांक (१) अन्वये १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसाठी आवश्यकता प्रमाणपत्र देण्यात आले होते. तद्नंतर सदर प्रमाणपत्र व तपासणीच्या आधारे राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली अंतर्गत मेडिकल असेसमेंट अँड रेटींग बोर्ड (MARB) यांनी सदर महाविद्यालयासाठी संदर्भ क्रमांक (२) येथील पत्रान्वये ५० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसाठी मान्यता (LoP) प्रदान केली आहे.त्यानुषंगाने सदर संस्थेस शैक्षणिक वर्ष सन २०२४-२५ साठी एम.बी.बी.एस. (वैद्यकीय) अभ्यासक्रमाच्या प्रथम वर्षाकरिता ५० विद्यार्थी प्रवेशित करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली अंतर्गत मेडिकल असेसमेंट अँड रेटींग बोर्ड (MARB) यांनी संदर्भ क्रमांक (२) येथील पत्रान्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने डॉ. बाबासाहेब आंबेडकर वैद्यकीय प्रतिष्ठान, डॉ. हेडगेवार हॉस्पिटल, छत्रपती संभाजीनगर संचलित श्री रामचंद्र इन्स्टिट्युट ऑफ मेडिकल सायन्सेस (एसआरआयएमएस), गट क्र. २२/२४, मुर्तूजापूर, बीड बायपास रोड, छत्रपती संभाजीनगर या महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी एमबीबीएस अभ्यासक्रमाच्या प्रथम वर्षाकरिता ५० विद्यार्थी प्रवेशित करण्यासाठी पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून परवानगी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

१) डॉ. बाबासाहेब आंबेडकर वैद्यकीय प्रतिष्ठान, डॉ. हेडगेवार हॉस्पिटल, छत्रपती संभाजीनगर संचलित श्री रामचंद्र इन्स्टिट्युट ऑफ मेडिकल सायन्सेस (एसआरआयएमएस), गट क्र. २२/२४, मुर्तूजापूर, बीड

बायपास रोड, छत्रपती संभाजीनगर या महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी या वैद्यकीय महाविद्यालयातील विद्यार्थी प्रवेश क्षमता राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली अंतर्गत मेडिकल असेसमेंट अँड रेटींग बोर्ड (MARB) यांनी निर्धारित केल्यानुसार ५० एवढी राहील.

२) राज्य शासन/ केंद्र शासन/ मा. सर्वोच्च न्यायालय अथवा मा. उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या आदेशानुसार सदर अभ्यासक्रमाच्या प्रवेशाकरीता निश्चित करण्यात आलेली कार्यपध्दत अवलंबिण्यात यावी.

३) शासकीय नियम/निर्णय/अधिनियम, मा. सर्वोच्च व मा. उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या निर्णयानुसार शैक्षणिक शुल्कासाठी जी कार्यपध्दती अनुसरणे वेळोवेळी भाग असेल, त्याप्रमाणे शैक्षणिक शुल्क निश्चित करावे.

४) केंद्र शासन, भारतीय आयुर्विज्ञान परिषद, नवी दिल्ली व राज्य शासन यांनी वैद्यकीय अभ्यासक्रमाबाबत वेळोवेळी विहीत केलेल्या नियमांचे व मानकांचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

५) महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिटयुशन्स (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ (महाराष्ट्र ॲक्ट १९८८ चा ६) मधील तरतुदींचे संस्थेने काटेकोरपणे पालन करणे आवश्यक आहे.

६) सदर संस्थेस कायम विना अनुदान तत्वावर मान्यता देण्यात आली आहे. त्यामुळे संस्था आवर्ती/अनावर्ती स्वरुपाच्या खर्चासाठी अनुदानाची मागणी शासनाकडे करणार नाही.

७) शासकीय वैद्यकीय किंवा तत्सम महाविद्यालयातील कोणत्याही अध्यापकास तो सेवानिवृत्त होईपर्यंत किंवा नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त होईपर्यंत संस्थेमध्ये नोकरी देता येणार नाही किंवा त्याच्या सेवा संस्थेस वापरता येणार नाहीत.

८) संस्थेने कोणत्याही परिस्थितीत शासनाने मान्य केलेल्या विद्यार्थी प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त विद्यार्थी प्रवेशित करू नये.

९) केंद्र शासनाने दिलेली परवानगी ही सन २०२४-२५ वर्षाकरिता प्रवेशित होणारे विद्यार्थी सदर अभ्यासक्रमाच्या अंतिम वर्षामध्ये दाखल होईपर्यंत असून संस्थेने त्यानुसार पुढील वर्षाचे विद्यार्थी प्रवेश करण्यापूर्वी केंद्र शासनाच्या तसेच त्या आधारे महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठाच्या परवानगीचे नूतनीकरण करुन घेणे बंधनकारक राहील.

१०) गुणवत्तेवर आधारित प्रवेश केलेल्या विद्यार्थ्यांच्या याद्या प्रवेश नियामक प्राधिकरण यांच्याकडून मंजूर करुन घेणे व या अभ्यासक्रमासाठी आकारण्यात येणाऱ्या शुल्काची निश्चिती शुल्क नियामक प्राधिकरणाकडून करुन घेणे, संस्थेसाठी बंधनकारक असेल.

११) सदर आदेश संदर्भ क्र.(२) येथील राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोगाच्या दिनांक १०.०८.२०२४ च्या पत्रान्वये दिलेली मान्यता विचारात घेऊन, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ अधिनियम, १९९८ मधील कलम ६४ नुसार शासनास प्रदत्त असलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

१२) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२३१७११५००७१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D025934340956DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2024.08.23 18:14:19 +05'30'

(अजित सासुलकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, ८ व ९ वा मजला, न्यु एक्सेलसिअर बिल्डींग, ए.के.नायक मार्ग, फोर्ट, मुंबई.
७) सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, शासकीय तंत्रज्ञान इमारत, ३०५, ३रा मजला, ४९, खेरवाडी, बांद्रा (पूर्व), मुंबई
८) आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, एक्सेलसिअर बिल्डींग, ए.के.नायक मार्ग, फोर्ट, मुंबई.
९) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि आयुष, मुंबई.
१०) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई.
११) कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक.
१२) सर्व सह सचिव/उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) अधिष्ठाता, सर्व शासकीय वैद्यकीय महाविद्यालये.
१४) अधिष्ठाता/प्राचार्य, श्री रामचंद्र इन्स्टिट्युट ऑफ मेडिकल सायन्सेस (एसआरआयएमएस), छत्रपती संभाजीनगर
१५) निवडनस्ती (शिक्षण-१).